जळगाव जिल्हयातील चाळीसगाव येथे स्थापन करण्यात आलेल्या दिवाणी न्यायाधीश (वरिष्ठ स्तर) न्यायालयाच्या निधीबाबत.

# महाराष्ट्र शासन
## विधि व न्याय विभाग,
## शासन निर्णय क्र.संकीर्ण-०२१७/१४२/प्र.क्र.७२/कार्या-११

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई , ४०० ०३२
दि.९ ऑगस्ट , २०१८.

वाचा :- १) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय समक्रमांक दि.२३/५/२०१८.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. पूरक २०१८/प्र.क्र.९५/अर्थ-३, दि.२७/७/२०१८.

**प्रस्तावना :-**

मा. उच्च न्यायालयाच्या प्रस्तावानुसार जळगाव जिल्हयातील चाळीसगाव येथे दिवाणी न्यायाधीश (वरिष्ठ स्तर) न्यायालय स्थापन करण्यास व त्यासाठी पदनिर्मिती करण्यास शासन निर्णय क्र. संकीर्ण-०२१७/१४२/प्र.क्र.७२/कार्या-११, दि.२३/५/२०१८ अन्वये शासन मान्यता देण्यात आलेली आहे. सदर शासन निर्णयामध्ये निधी उपलब्धतेबाबचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील असे नमूद केले होते. त्यानुसार या न्यायालयासाठी जुलै २०१८ च्या पावसाळी अधिवेशनामध्ये लाक्षणिक पुरवणी मागणी वित्त विभागामार्फत विधानमंडळास सादर केली होती. ती मंजूर झालेली आहे. त्यानुसार सदर न्यायालयासाठी निधी उपलब्ध करून देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

जळगाव जिल्हयातील चाळीसगाव येथे स्थापन केलेल्या दिवाणी न्यायाधीश (वरिष्ठ स्तर ) या न्यायालयाकरीता खालीलप्रमाणे लाक्षणिक पुरवणी मागणी विधानमंडळाने मंजूर केलेली आहे.

| अ.क्र. | उद्दिष्ट | रक्कम रुपयात |
|---|---|---|
| १ | ०१- वेतन | १,००० |
| २ | ०३- अतिकालीक भत्ता | १,००० |
| ३ | ०६- दूरध्वनी/वीज/पाणी | १,००० |
| ४ | ११-प्रवास खर्च | १,००० |
| ५ | १३-कार्यालयीन खर्च | १,००० |
| | एकूण | ५,००० |

२. सदर लाक्षणिक पुरवणी मागणी, मागणी क्र. जे-१, २०१४, न्यायदान, १०५, दिवाणी व सत्र न्यायालये, (०२)जिल्हा व सत्र न्यायाधीश, (०२)(०१)जिल्हा व सत्र न्यायाधीश (अनिवार्य) (२०१४ ०१७२ ) या लेखाशीर्षाखाली मंजूर झालेली आहे. त्यानुसार सदर लाक्षणिक पुरवणी मागणीचा उपरोक्त तक्त्यातील नमूद पाच उद्दिष्टांकरीता मंजूर झालेला रु.५०००/-(रु. पाच हजार फक्त) इतका निधी नियंत्रक अधिकारी प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, जळगाव ( जे -००२१ ) यांना याद्वारे वितरीत करण्यात येत आहे. तसेच सदर न्यायालयासाठी आवश्यक तो खर्च उपरोक्त नमूद लेखाशीर्षाखालील सन २०१८-१९ करीता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.६५४/१८/व्यय- ५ दि.०३.८.२०१८ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharastra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०८०९१५५६१४१७१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Santosh Sampatti Navagire

Digitally signed by Santosh Sampatti Navagire
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law And Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=214b4345a2842afe7dd0cbda9e8d83579cbedaaaef30f215ceda096e4e407797, serialNumber=0cb1b0de020015cf6d1f800579271f4816460b1802c2ae247dd6dd6f47462cd3, cn=Santosh Sampatti Navagire
Date: 2018.08.09 15:58:01 +05'30'

**( सं. सं. नवगिरे )**
कार्यासन अधिकारी

**प्रति,**

१. मा. प्रबंधक(निरीक्षणे-१), उच्च न्यायालय,मुंबई ( पत्राने ),
२. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, जळगाव,
३. दिवाणी न्यायधीश (कनिष्ठ स्तर), चाळीसगाव,जि.जळगाव
४. महालेखापाल (लेखापरिक्षा व लेखा अनुज्ञेयता )महाराष्ट्र-१, मुंबई,
५. जिल्हा कोषागार अधिकारी, जळगाव,
६. वित्त विभाग, कार्यासन - व्यय-५,मंत्रालय, मुंबई,
७. विधि व न्याय विभाग २३ व २४, मंत्रालय, मुंबई,
८. निवडनस्ती.

**************